**महाराष्ट्र शासन**

क्र.प्रतिनि-१०२०/सं.क्र.७३/प्र.क्र.०७ /का-१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार, दालन क्र.३५७,
पाचवा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २४ /०१/२०२०

प्रति,

सह सचिव/उप सचिव, (आस्था)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय- अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने पद भरण्याबाबत -**
मराठी भाषा विभागाअंतर्गत राज्य मराठी विकास संस्था या मुंबईतील शासन अनुदानित संस्थेच्या आस्थापनेवर प्रशासकीय अधिकारी हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

महोदय/महोदया,

मराठी भाषा विभागाअंतर्गत राज्य मराठी विकास संस्था या मुंबईतील शासन अनुदानित संस्थेच्या आस्थापनेवर प्रशासकीय अधिकारी हे पद मंत्रालयीन अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. यासाठी मंत्रालयीन विभागातील **अवर सचिव संवर्गातील** अधिकाऱ्यांकडून **दि.०१/०२/२०२० पर्यंत** इच्छुकता मागविण्यात येत आहेत.

२. आपल्या विभागातील सर्व अवर सचिवांना सदर प्रतिनियुक्तीबाबत अवगत करावे. इच्छुक अवर सचिवांचे मागील तीन वर्षांचे गोपनीय अहवाल (छायांकित प्रती) व पत्रासोबत जोडलेल्या विवरण पत्रामधील वैयक्तिक माहिती या विभागाकडे तात्काळ पाठवावी, ही विनंती. तसेच इच्छुक अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीसाठी निवड झाल्यास त्यांना संबंधित विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे याबाबतही कृपया अभिप्राय द्यावेत.

३. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००१२४१३०८०१६६०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

आपला विश्वासू,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.24 12:58:20 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत - विवरणपत्र**

प्रत - कक्ष अधिकारी, आस्था-२, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.

## विवरणपत्र

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>मुद्दा</th><th>तपशिल/अभिप्राय</th></tr>
<tr><td>१</td><td>अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.)</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>८</td><td>संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा)</td><td><table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>९</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१०</td><td>संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे.</td><td></td></tr>
</table>